**६ व्या वेतन आयोगानुसार अखिल भारतीय सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील अधिकाऱ्यांचे वेतन तसेच निवृत्तीवेतन सुधारीत झाल्यामुळे देय ठरणाऱ्या थकबाकीचा दुसरा हप्ता (६० टक्के रक्कम) अदा करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग**

शासन निर्णय क्रमांक:भाप्रसे-११०९/प्र.क्र.८४/२००९/९-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
**दिनांक : ०९ सप्टेंबर, २००९.**

**वाचा :-** १) सा.प्र.वि., शासन निर्णय क्रमांक:भाप्रसे-११०८/प्र.क्र.२४६/९-अ, दिनांक ६.१०.२००८ .
२) सा.प्र.वि., शासन निर्णय क्रमांक:भाप्रसे-११०८/प्र.क्र.२६०/९-अ, दिनांक ६.१०.२००८ .
३) सा.प्र.वि., शासन निर्णय क्रमांक:भाप्रसे-११०८/प्र.क्र.२४६/९-अ, दिनांक १०.१२.२००८ .
४) सा.प्र.वि., शासन निर्णय क्रमांक:भाप्रसे-११०८/प्र.क्र.२६०/९-अ, दिनांक ६.०३.२००९ .
५) सा.प्र.वि., शासन निर्णय क्रमांक:भाप्रसे-११०८/प्र.क्र.२८८/९-अ, दिनांक २०.१.२००९ .
६) सा.प्र.वि., शासन शुध्दीपत्रक क्रमांक:भाप्रसे-११०८/प्र.क्र.२८८/९-अ, दिनांक २४.०६.२००९ .
७) केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाचे क्र.१(२)/EV/२००८, दिनांक २५.०८.२००९ चे कार्यालयीन ज्ञापन.
८) केंद्र शासनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाचे F.No.३८/३७/०८-P&PW(A), दिनांक २५.०८.२००९ चे कार्यालयीन ज्ञापन.

**प्रस्तावना :-**

६ व्या वेतन आयोगाच्या शिफारशींच्या अनुषंगाने अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांचे वेतन तसेच निवृत्तीवेतन सुधारित झाल्यामुळे देय ठरणाऱ्या एकूण वेतनाच्या / निवृत्तीवेतनाच्या थकबाकीपैकी ४० टक्के रक्कम सन २००८ - ०९ या आर्थिक वर्षात रोखीने प्रदान करण्याचा निर्णय घेण्यात आला होता. तर उर्वरित ६० टक्के रक्कम प्रदान करण्याबाबत स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येतील असे स्पष्ट करण्यात आले होते. तसेच दिनांक ०१.०१.२००६ ते दिनांक ३१.०३.२००९ या कालावधीत सेवानिवृत्त झालेल्या अखिल भारतीय सेवतील अधिकाऱ्यांना वेतननिश्चिती झाल्यानंतर वेतन थकबाकीची १०० टक्के रक्कम रोखीने देण्याबाबत निर्णय घेण्यात आला होता. केंद्र शासनाने आता त्यांच्या उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक ५ व ६ येथील दिनांक २५.०८.२००९ च्या कार्यालयीन ज्ञापनान्वये वेतन तसेच निवृत्तीवेतनासंदर्भातील उर्वरित ६० टक्के थकबाकीची रक्कम अदा करण्याबाबत आदेश निर्गमित केले आहेत. हे लक्षात घेता, अखिल भारतीय सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील अधिकाऱ्यांना वेतन तसेच निवृत्तीवेतन यासंदर्भातील थकबाकीची उर्वरित ६० टक्के रक्कम अदा करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. **वेतनसंदर्भातील थकबाकीची रक्कम :-** अखिल भारतीय सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील अधिकाऱ्यांचे वेतन ६ व्या वेतन आयोगानुसार सुधारित झाल्यामुळे दिनांक ०१.०१.२००६ ते दिनांक ३१.०८.२००८ या कालावधीसाठी देय ठरणाऱ्या थकबाकीपैकी उर्वरित ६० टक्के रक्कम, रोखीने प्रदान करण्यात यावी.

याबाबत साप्रवि शासन निर्णय क्रमांक - भाप्रसे-११०८/प्र.क्र.२८८/०८/९-अ, दिनांक २०.०१.२००९ व शासन शुध्दीपत्रक दिनांक २४.०६.२००९ मधील सूचना विचारात घ्याव्यात. त्यानुसार यासंदर्भातील खर्च त्या-त्या विभागाच्या / कार्यालयाच्या वेतन व भत्ते यासाठीच्या तरतूदीतून अदा करण्यात यावा आणि तो संबंधित विभागाच्या / कार्यालयाच्या अर्थसंकल्पीय शिर्षाखाली खर्ची टाकावा. यासाठी लागणारी आवश्यक ती अतिरिक्त तरतूद अर्थसंकल्पीत करण्याची जबाबदारी त्या - त्या प्रशासकीय विभागाची राहील.

२. **निवृत्तीवेतन / कुटुंबनिवृत्तीवेतनासंदर्भातील थकबाकीची रक्कम :-** अखिल भारतीय सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील अधिकाऱ्यांचे निवृत्तीवेतन / कुटुंबनिवृत्तीवेतन ६ व्या वेतन आयोगानुसार सुधारित झाल्यामुळे दिनांक ०१.०१.२००६ ते दिनांक ३१.०८.२००८ या कालावधीसाठी देय ठरणाऱ्या निवृत्तीवेतन / कुटुंबनिवृत्तीवेतन थकबाकीची उर्वरित ६० टक्के रक्कम, रोखीने प्रदान करण्यात यावी. याबाबत संबंधित निवृत्तीवेतन संवितरण प्राधिकारी (यथास्थिती अधिदान व लेखा अधिकारी / कोषागार अधिकारी) यांनी दक्षता घ्यावी.

यासंदर्भातील खर्च निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ याबाबतचा खर्च ज्या लेखाशिर्षांतर्गत तरतूदीतून अदा करण्यात येतो त्या लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकावा.

३. हा शासन निर्णय दिनांक १.१.२००४ नंतर सेवाप्रविष्ट झालेल्या व नवीन निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांना लागू राहणार नाही. त्यांच्या संदर्भात स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येतील.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४६३/सेवा-९, दिनांक ०९.०९.२००९ व अनौपचारिक संदर्भ क्र.२४१/सेवा-४, दिनांक ०९.०९.२००९ च्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २००९०९०९१६४१५२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**रो.स.भालेकर**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई,
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -२, नागपूर,
६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई,
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -२, नागपूर,
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
११. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई,
१२. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे / नागपूर / औरंगाबाद / नाशिक,
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१४. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
१५. संवर्ग पदावर कार्यरत सर्व भाप्रसे अधिकारी,
१६. संवर्ग पदावर भाप्रसे अधिकारी कार्यरत असलेले सर्व कार्यालय प्रमुख,
१७. मंत्रालयीन सर्व प्रशासकीय विभाग,
१८. वित्त विभाग / सेवा-४, सेवा-९, अर्थसंपकल्प-२५, व्यय-४,
१९. गृह विभाग (भा.पो.से. संबंधाने),
२०. महसूल व वन विभाग (भा.व.से. संबंधाने), } त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी हे आदेश त्यांच्या अधिपत्याखालील सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावेत.
२१. महासंचालक आणि पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र शासन, मुंबई,
२२. प्रधान मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र शासन, पुणे,
२३. सर्व विभागीय आयुक्त,
२४. सर्व जिल्हाधिकारी,
२५. सर्व जिल्हा परिषद, मुख्य कार्यकारी अधिकारी,
२६. महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील सर्व संबंधित सांविधिक व सार्वजनिक उपक्रम, महामंडळे व महानगरपालिका,
२७. सचिव, कार्मिक व प्रशिक्षण लोकशिकायत व निवृत्तीवेतन मंत्रालय, नवी दिल्ली,
२८. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
२९. संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,
३०. सामान्य प्रशासन विभाग / कार्या.क्र.९, १०, १९, २१ व २६,
३१. **निवडनस्ती.**

एच-१६००-१अ.

—x—